राष्ट्रीय कृषि विकास योजनेअंतर्गत “संरक्षित शेती” प्रकल्प सन २०१९-२० मध्ये राबविण्यास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कृषी,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : राकृवि-२०१९/प्र.क्र. ३६५/९-अे**
**मादाम कामा रोड,हुतात्मा राजगुरु चौक**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२**
**दिनांक : ०४ फेब्रुवारी, २०२०**

**संदर्भ:-**१. राष्ट्रीय कृषि विकास योजनेच्या राज्य स्तरीय प्रकल्प मंजुरी समितीच्या २७ व्या बैठकीचे इतिवृत्त शासन पत्र संकीर्ण-राकृवि-०५१९/प्र.क्र.१४३/राकृवियो कक्ष, दि. २०/०७/२०१९ चे पत्र.
२. संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन व औषधी वनस्पती मंडळ यांचे जा.क्र. मराफऔवमं /सं.शे./ २८८३/२०१९, दि. १६/१२/२०१९ चे पत्र व जा.क्र.मराफाऔवमं/सं.शे./८२/२०२०, दि.१३/०१/२०२० चे पत्र.

**प्रस्तावना :-**

मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांच्या अध्यक्षतेखालील दिनांक ०४ जुलै, २०१९ रोजी झालेल्या राष्ट्रीय कृषि विकास योजनेच्या राज्यस्तरीय प्रकल्प मंजुरी समितीच्या (SLSC) २७ व्या बैठकीत सन २०१९-२० मध्ये राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत **संरक्षित शेती प्रकल्प** राज्यात राबविण्याकरिता मंजुरी देण्यात आली आहे. राज्यस्तरीय प्रकल्प मंजूरी समितीने सन २०१९-२० या आर्थिक वर्षात रू.११.०० कोटी नियतवाटप मंजूर केलेले आहे.

राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत संरक्षित शेती प्रकल्प सन २०१९-२० मध्ये राबविण्यास रू.११.०० कोटीच्या कार्यक्रमास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. तद्नुषंगाने शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

१. सन २०१९-२० मध्ये राष्ट्रीय कृषि विकास योजनेअंतर्गत रू.११.०० कोटी किंमतीचा “संरक्षित शेती प्रकल्प” राज्यात राबविण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.
२. सदर प्रकल्प एकात्मिक फलोत्पादन विकास अभियानाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार राज्यात राबविण्यात येईल.
३. मंजूर निधीपैकी केंद्र शासनाचा हिस्सा ६० टक्के व राज्य शासनाचा हिस्सा ४० टक्के राहील.
४. राज्यास प्राप्त होणाऱ्या एकूण आर्थिक लक्षांकाचे राज्यातील सर्व जिल्ह्यांना/तालुक्यांना समन्यायी प्रमाणात वाटप करावायचे असून सदर आर्थिक लक्षांकाच्या मर्यादेत शेतकऱ्यांना निवड करण्याची मुभा राहील.(प्रपत्र अ)
५. विभागाच्या हॉर्टनेट प्रणालीद्वारे शेतकऱ्यांचे अर्ज ऑनलाईन मागवून घ्यावेत. प्रकल्पातंर्गत लाभार्थ्यांची निवड सोडत पध्दतीने करण्यात यावी.
६. निवडलेल्या लाभार्थ्यांना सक्षम प्राधिकारी यांनी पूर्व संमती दिल्यानंतरच संरक्षित शेती प्रकल्प अंतर्गत नविन घटकांना अनुदान देण्यात यावे.

७. लाभार्थ्याने संरक्षित शेती प्रकल्पाची उभारणी केल्यानंतर त्याबाबतच्या नोंदी जिओ-टॅगींग द्वारे करण्यात याव्यात.

८. लाभार्थ्याच्या ७/१२ उताऱ्यावर नोंद घेतल्याशिवाय अनुदान अदा करू नये.

९. अनुसुचित जाती, अनूसूचित जमाती, महिला लाभार्थी, अल्प व अत्यल्प भूधारक शेतकरी यांना मार्गदर्शक सूचनांनुसार विहित प्रमाणात प्राधान्याने अर्थसहाय्य उपलब्ध करून द्यावे.

१०.प्रस्तूत प्रकल्प राबविण्याकरिता निधी वितरणाची कार्यवाही राष्ट्रीय कृषि विकास योजना कक्ष, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई यांच्याकडून करण्यात येईल.

११.प्रकल्पाची अंमलबजावणी व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन व औषधी वनस्पती मंडळ, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे सनियंत्रणाखाली कृषि विभागामार्फत करण्यात यावी.

१२.व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे यांनी, केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनानुसार या योजनेचा आर्थिक व भौतिक प्रगती अहवाल विहित मुदतीत केंद्र शासनाला तसेच राज्य शासनाला सादर होईल याची दक्षता घेण्यात यावी.

१३. राष्ट्रीय कृषि विकास योजनेअंतर्गत, संरक्षित शेती या प्रकल्पासाठी उपलब्ध करुन देण्यात येणारा निधी लाभार्थ्यांच्या आधार संलग्न बँक खात्यावर थेट जमा करण्यात यावा. सदर निधी अखर्चित राहणार नाही याची अंमलबजावणी यंत्रणांनी काळजी घ्यावी.

१४.योजनेतील निधी खर्चाचे लेखा परिक्षित उपयोगिता प्रमाणपत्र व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन व औषधी वनस्पती मंडळ, पुणे यांनी राकृवियो कक्ष, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई यास वेळोवेळी सादर करण्याची कार्यवाही करावी.

१५.सदर शासन निर्णयाची काटेकोरपणे अमंलबजावणी होईल याची दक्षता आहरण व संवितरण अधिकारी यांनी घ्यावी. या योजनेसाठी खर्च करताना सर्व वित्तीय नियम, विनियम, वित्तीय शासन निर्णय, अधिसूचना, आदेश, केंद्र शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेले आदेश, केंद्रीय दक्षता आयोगाच्या मार्गदर्शक सूचना आणि भारताचे नियत्रंक व महालेखापरिक्षक यांचे या संदर्भातील निरिक्षण आणि खर्चात अनियमतता होणार नाही यांचे पालन होईल या अटीच्या अधिन राहून निधी खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

१६.सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००२०५१२३५५१६५०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Ashok Maroti Atram
Date: 2020.02.05 12:36:55 +05'30'

**(अशोक आत्राम)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मंत्री (फलोत्पादन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
२. मा.राज्यमंत्री (फलोत्पादन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई -३२

३. मा.विधानपरिषद/विधानसभा सदस्य, विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
४. मा. सचिव, (कृषि) यांचे स्वीय सहाय्यक,कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई -३२
५. आयुक्त कृषी, कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य,पुणे.
६. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे
७. सर्व संचालक कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य,पुणे,
८. सर्व विभागीय कृषी सहसंचालक, महाराष्ट्र राज्य
९. सर्व जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी, महाराष्ट्र राज्य
१०. सहाय्यक संचालक (लेखा) कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
११. महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता ) (लेखा परीक्षा ) मुंबई /नागपूर,
१२. संचालक लेखा व कोषागार अधिकारी, मुंबई ( २ प्रती)
१३. सहसंचालक लेखा व कोषागारे संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५वा मजला, मुंबई -३२,
१४. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१५. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
१६. निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई
१७. लेखाधिकारी, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे
१८. माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२.
१९. निवड नस्ती ९-अे